वितरण आदेश क्र.७

सन २०१५-१६

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,
नाथनगर, (उत्तर), पैठण, जिल्हा-औरंगाबाद
सहाय्यक अनुदान २०१५-२०१६ (योजनेतर)
जून २०१५ ते ऑक्टोबर २०१५ ( दुसरा हप्ता )

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०१५/प्र.क्र.८४ /१५/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक:- ७ सप्टेंबर, २०१५

वाचा : १. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१५/ प्र.क्र.७९ /२०१५/२५, दि.८ एप्रिल, २०१५
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ- ३, दि.१७ एप्रिल, २०१५.
३. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक यशदा २०१५/प्रक्र.८४/१५/१२-अ, दि. ४ जून, २०१५.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१५/ प्र.क्र.७९ /२०१५/ दि.१८ जून, २०१५.

**शासन निर्णय**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेला सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षाच्या योजनेतर खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये वेतनेतर रु.२५.०० लाख व वेतने रु.५०.९५ लाख अशी एकूण रु. ७५.९५ लाख (अक्षरी रुपये पंच्याहत्तर लाख, पंच्याण्णव हजार फक्त) इतकी तरतूद करण्यात आली असून, त्यापैकी रु. १२.६६ लाख (अक्षरी रुपये बारा लाख, सहासष्ट हजार फक्त) एवढे लेखा अनुदान एप्रिल व मे, २०१५ या दोन महिन्यांकरिता योजनेतर खर्चासाठी मंजूर करण्यात आले होते. आता संदर्भाधीन क्र.४ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पिय अंदाजामध्ये केलेल्या तरतूदीच्या अनुषंगाने संपूर्ण योजनेतर सहाय्यक अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेला संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये संस्थेला विकास प्रशिक्षण व तद्नुषंगिक खर्च तसेच अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन यासाठी एप्रिल व मे, २०१५ या दोन महिन्यांकरिता वेतनेतर रु. ४,६६,०००/- व वेतने रु.८,००,०००/-असे एकूण रु. १२,६६,०००/- (अक्षरी रुपये बारा लाख, सहासष्ट हजार फक्त) इतके योजनेतर सहाय्यक अनुदान ( पहिला हप्ता) वितरित करण्यात आला होता.

आता संस्थेस जून २०१५ ते ऑक्टोबर २०१५ या पाच महिन्यांकरिता योजनेतर ( वेतनेतर व वेतने ) खर्चासाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ च्या शासन परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पिय अनुदानाच्या ७०% च्या मर्यादेत, अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या सहायक अनुदानामधून, संस्थेस विकास प्रशिक्षण व तद्नुषंगिक खर्च तसेच अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन या खर्चासाठी वेतनेतर रु.६,४२,०००/- व वेतने रु.१३,८३,००० /-असे एकूण रु. २०,२५,०००/- ( अक्षरी रुपये वीस लाख, पंचवीस हजार, फक्त ) इतके योजनेतर सहाय्यक अनुदान ( दुसरा हप्ता ) मंजूर करण्यात येत आहे..

३ हा खर्च मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ - प्रशिक्षण (००) (०७) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहाय्यक अनुदान (योजनेतर) (२०७० ०७४६) याखाली सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून "३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" याखाली

रु. ६,४२,०००/-( अक्षरी रुपये सहा लाख, बेचाळीस हजार फक्त) व "३६ सहाय्यक अनुदाने (वेतने)" याखाली रु.१३,८३,००० /- ( अक्षरी रुपये तेरा लाख, त्र्याऐंशी हजार फक्त ) याप्रमाणे भागविण्यात यावा.

४. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

५. संस्थेने आर्थिक वर्ष २०१५-२०१६ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा

६. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

७. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ- ३, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०७१५४३५७७३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2015.09.07 15:47:39 +05'30'

**( अजित सो. देशमुख )**
अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग

**प्रत**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) मा. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
५) संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद
६) उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद
७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
८) उप कोषागार कार्यालय, पैठण, जि.औरंगाबाद.
९) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प ३ व १४), मंत्रालय, मुंबई
१०) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
११) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ